**प्रशासकीय मान्यता**

विभागीय उप आयुक्त व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, नागपूर या दोन्ही कार्यालयाच्या अधिनस्त कार्यालयासाठी **कार्यालयीन इमारतीच्या बांधकामाबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक बीजीटी-२००८/प्रक्र-५८/इएक्ससी-४,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.**
**दिनांक : ७ जानेवारी, २०१०.**

**वाचा : आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्रमांक बीएलडी-२००८/ २०८३७/३३/सहा, दिनांक ९ मार्च, २०१०.**

**शासन निर्णय :**

राज्य उत्पादन शुल्क विभागाच्या नागपूर कार्यालयाची कॉटन मार्केट वेअर हाऊस येथील जागा विभागाच्या मालकीची असून सदर जागेतील कार्यालयीन इमारत जुनी झालेली आहे. त्यामुळे सदर जागेवर नागपूर विभागीय उप आयुक्त व अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क हे दोन्ही कार्यालयेव अधिनस्त कार्यालयासाठी कार्यालयीन इमारत, बांधकामाचा प्रस्ताव आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क कार्यालयाने सादर केला आहे. सदर कामाचे अंदाजपत्रक सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारीत आहे. अंदाजपत्रक उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक-३, नागपूर यांनी तयार केले असून सक्षम अधिकारी म्हणून कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, क्रमांक-१ नागपूर यांनी साक्षांकित केले आहे. सदर अंदाजपत्रकामध्ये संभाव्य भाववाढीची तरतूद करुन एकूण रुपये ६,३५,२३,६८२/- (एकूण रुपये सहा कोटी, पसतीस लाख, तेव्वीस हजार, सहाशे ब्याऐंशी फक्त) इतक्या सुधारित रकमेच्या खर्चाच्या प्रस्तावास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दर्शविली आहे. त्यानुसार प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. प्रस्तुत इमारतीचे काम वास्तुशास्त्रज्ञ नकाशा व इमारतीचा सविस्तर नकाशा तयार करुन त्यास मंजूरी घेतल्यावरच सुरु करावे. अंतर्गत रस्ते व संरक्षण भिंत, पार्किंग इ. कामाचा छेद नकाशा मापे व वायासह अंदाजपत्रकासोबत जोडावा. काम सुरु करण्यापूर्वी जागा मालकी हक्काबाबतची सर्व पूर्तता करावी. ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदींबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक विअप्र-१०.०८/प्रक्र-७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ सोबतच्या परिशिष्टातील वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग-५ मधील अनुक्रमांक-१ अन्वये "महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिका" अंतर्गत परिच्छेद क्रमांक-१३४, अट

क्रमांक-१ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या शक्तींचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे. वित्तिय मान्यतेबाबतचे आदेश स्वतंत्ररित्या निर्गमित करण्यात येतील.

सदरचा निर्णय सार्वजनिक बांधकाम विभाग संदर्भ क्रमांक २८७६/इमा-२, दिनांक १९.११.२०१० अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आली असून, त्याचा संगणक संकेतांक २०११०१०७१५२६५७००१ हा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

[प्र. मु. काकड]
कार्यासन अधिकारी, गृह विभाग, महाराष्ट्र शासन.

प्रति,

आयुक्त, राज्य उत्पादन शुल्क, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महालेखापाल-१/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
विभागीय उप आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
अधीक्षक, राज्य उत्पादन शुल्क, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नागपूर जिल्हा नागपूर.
सार्वजनिक बांधकाम विभाग (इमारती-२)(अर्थ-२), मंत्रालय, मुंबई.
वित्त विभाग (व्यय-१/विनिमय), मंत्रालय, मुंबई.
संगणक समन्वय कक्ष, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती कार्यासन इपवृसनी-४, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.